**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम**
**वित्तिय वर्ष २०२२-२३ करीता वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थेस एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाकरिता ३६-सहायक अनुदान (वेतन) या बाबीखाली माहे एप्रिल २०२२ करीता अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीयुडी-०४२२/प्र.क्र.२९/सीपीटीपी-ब**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक- २२ एप्रिल, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०/०१/२०१४.

२) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र क्रमांक जा.क्र.लेखा.०२२१/वनामती/सीपीटीपी/१३३९/२०२१,दिनांक १८/०४/२०२२.

प्रस्तावना :-

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दिनांक २०/०१/२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष ए-४, २०७०-इतर प्रशासनिक सेवा, (००)(११),वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८६२) या लेखाशिर्षाखाली ३६-सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाखाली या संस्थेला माहे एप्रिल २०२२ करीता निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय : -

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता लेखाशिर्ष ए-४, २०७०-इतर प्रशासनिक सेवा, (००)(११), वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८६२) या लेखाशिर्षाखाली ३६-सहायक अनुदान (वेतन) या उद्दीष्टाखाली रु.८२, ७४,०००/- तसेच ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दीष्टाखाली रु.६,७९,२१,०००/- अशी एकूण रु. ७,६१,९५,०००/- (अक्षरी रूपये सात कोटी एकसष्ट लाख पंच्यानौव हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे.

२. उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक २ येथील वनामती प्रशिक्षण संस्थेच्या विनंतीनुसार सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता लेखाशिर्ष ए-४, २०७०-इतर प्रशासनिक सेवा, (००)(११), वनामती, नागपूर या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८६२) या लेखाशिर्षाखाली ३६-सहायक अनुदान ( वेतन ) या उद्दीष्टाखाली माहे एप्रिल २०२२ करिता **रु. ६,००,००० /- (रूपये सहा लाख फक्त )** इतके अनुदान अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीव्दारे (बिम्स ) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर प्रशिक्षण संस्थेस पुढील अटी व व शर्तीच्या अधीन राहून वितरित करण्यात येत आहे.

अ) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तिय नियमावली, अर्थसंकल्पिय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी, शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर यांची राहील.

आ) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर या संस्थेने खर्च वितरीत अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम कोषागारातून आहरीत करण्याची दक्षता घ्यावी.

इ) प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम आहरीत केल्यानंतर आहरीत केलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीषार्खाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करून घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसाच्या आत शासनास सादर करावे.

ई) सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

उ) वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE ), विहीत कालावधीत न चुकता महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

४. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावीत. सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई / नागपूर यांना राहतील व त्याकरीता वनामती त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

५. वित्त विभागाच्या दिनांक ०४ एप्रिल, २०२२ च्या परिपत्रकातील नमूद अटी व शर्तीचे पालन करुन सदर निधी खर्च करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०४२२११२६४२९६०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNILSING SHIVAJI NIKAM

Digitally signed by SUNILSING SHIVAJI NIKAM
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b98ce938374a86717bb5977ddbce16908e9c51533d252564989be91f4b805764, serialNumber=f77d903492f7578562d032fa9f7e1fa812cb18daf3aee53af4aa4e8a0b74337e, cn=SUNILSING SHIVAJI NIKAM
Date: 2022.04.25 11:11:45 +05'30'

**( सु. शि. निकम )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१,मुंबई,
२. महालेखापाल, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-२,नागपूर,
३. अपर मुख्य सचिव ( सेवा ) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था ( वनामती ), नागपूर
५. वरिष्ठ प्रशासनिक व लेखाधिकारी, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था वनामती, नागपूर ( ३ जादा प्रतींसह),
६. सह संचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,

७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर
८. उप कोषागार कार्यालय, नागपूर
९. वित्त विभाग ( व्यय-४/अर्थसंकल्प-३ ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन क्रमांक २५ ) मंत्रालय मुंबई-३२.
११. निवड नस्ती कार्यासन सीपीटीपी-ब.